**अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि जात प्रमाणपत्र सादर न करू शकलेल्या निबंधक भागीदारी संस्था, महाराष्ट्र राज्य, मुंबई कार्यालयात१ लिपीक-टंकलेखक अधिसंख्य पद निर्माण करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आयपीए-२१२०/प्र.क्र.५८/का. एक**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : - २० ऑक्टोबर २०२०

**पहा:-** १) शासन निर्णय, विधि व न्याय विभाग, क्र : आयपीए-२११६/प्र.क्र.३७/का.१, दि. १३ डिसेंबर २०१९
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. बीसीसी २०१८/प्र.क्र.३०८/का. १६-ब, दि. २१ डिसेंबर २०१९.
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. बीसीसी २०२०/प्र.क्र.१८७ अे/का. १६-ब, दि. ३० जुन २०२०.
४) प्रभारी निबंधक भागीदारी संस्था, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. आस्था-३८/ रखेकुं/ ५४६२/९३५/(२०६/१५)/दोन/११२, दि. ११ ऑगस्ट २०२०.

**प्रस्तावना :-**

मा. सर्वोच्च न्यायालयाने सिव्हील अपील क्र.८९२८/२०१५ (चेअरमन ॲन्ड मॅनेजिंग डायरेक्टर, एफसीआय आणि इतर विरूध्द जगदीश बलराम बहीरा व इतर) व इतर याचिका यामध्ये दि. ०६.०७.२०१७ रोजी मागास जातींना असलेल्या आरक्षणाच्या आधारे शासकीय सेवेत दाखल झालेल्या व त्यानंतर जातीचे दावे अवैध ठरलेल्या व्यक्तींना शासकीय सेवेत संरक्षण देय ठरणार नाही, या निर्णयाची अंमलबजावणी करण्यासाठी मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर यांनी रिट याचिका क्र. ३१४०/२००८ मध्ये दि. २८.०९.२०१८ च्या आदेशान्वये मा. सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार दि. ३१.१२.२०१९ पर्यंत कार्यवाही करण्याचे आदेश दिले आहेत. मा. उच्च न्यायालयाचे आदेश विचारात घेता, विधि व न्याय विभागाच्या अधिपत्याखालील निबंधक भागीदारी संस्था, महाराष्ट्र राज्य कार्यालयामध्ये लिपीक-टंकलेखक या संवर्गात १ अधिसंख्य पद निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय दि. ३०.६.२०२० अन्वये मा. सर्वोच्च न्यायालयाने सिव्हील अपील क्र.८९२८/२०१५ व इतर याचिकेमध्ये दि. ०६.०७.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाचे व मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ नागपूर यांनी रिट याचिका क्र. ३१४०/२०१८ मध्ये दिनांक २८.९.२०१८ च्या आदेशाची अंमलबजावणी करण्याकरीता "अधिसंख्य पद" निर्माण करण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेले आहेत. त्यानुसार, विधि व न्याय विभागाच्या अधिपत्याखालील निबंधक भागीदारी संस्था, महाराष्ट्र राज्य, यांच्या आस्थापनेवर अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरलेल्या कर्मचाऱ्यासाठी लिपीक टंकलेखक, गट-क संवर्गातील १ अधिसंख्य पद निर्माण करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. निबंधक भागीदारी संस्था, महाराष्ट्र राज्य कार्यालयातील कर्मचारी यांची संवर्गनिहाय माहीती सोबतच्या सहपत्र "अ "व "ब" मध्ये दर्शवण्यात आली आहे. सहपत्रामधील संबंधित नियुक्ती प्राधिकारी यांनी सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि. २१.१२.२०१९ सोबत जोडलेल्या "परिशिष्ट ड" मधील नमुन्यात आदेश निर्गमित केलेल्या दिनांकापासून ११ महिन्याकरीता किंवा ते ११ महिन्यापेक्षा कमी काळ सेवेत राहीले असते तर ते ज्या दिनांकास सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत अधिसंख्य पद निर्माण करण्यात येत आहे.

३.    सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि.२१.१२.२०१९ अन्वये, नमूद सुचनांनुसार संबंधित कर्मचाऱ्यांची अधिसंख्य पदावर सद्याच्या पदस्थापनेवर नियुक्ती करणेबाबत आवश्यक कार्यवाही निबंधक भागीदारी संस्था, महाराष्ट्र राज्य यांचे मार्फत करण्यात यावी. सदर अधिसंख्य पदांच्या वेतनावर होणारा खर्च संबंधित कार्यालयाच्या आहरण व संवितरण अधिकारी यांनी वेतनासंबंधीच्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून संबंधित वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४.    सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि. २१.१२.२०१९ मधील तरतूदीनुसार व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि. ३०.०६.२०२० अन्वये, विधि व न्याय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५.    सदर शासननिर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२०१०२०१३०९३९६८१२ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,**

Mahendra
Shantaram Pujari

Digitally signed by Mahendra Shantaram Pujari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law & Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=16153bd1d85632a421d5a5fd23bf5e5bb624d27f2c8cf59fb17e3ead3a034dbc, serialNumber=404b91f6eb1b1feeadd0e630b486f2ff22c7073ccb93d334f083ceaefa447c09, cn=Mahendra Shantaram Pujari
Date: 2020.10.20 13:13:20 +05'30'

**(महेंद्र पुजारी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१.मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
२. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३. मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधानसभा महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. सर्व सन्माननिय सदस्य विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. मा.मुख्यमंत्री (विधि व न्याय) यांचे खाजगी सचिव,
८. मा. राज्यमंत्री (विधि व न्याय) यांचे खाजगी सचिव,
९. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांचे उपसचिव,
१०. प्रधानसचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग यांचे स्वीय सहायक,
११. प्रधान सचिव व वरिष्ठ विधि सल्लागार, विधि व न्याय विभाग यांचे स्वीय सहायक,
१२. निबंधक भागीदारी संस्था, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३. महालेखापाल-एक, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), मुंबई.
१४. महालेखापाल-दोन, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), मुंबई.
१५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई (२ प्रती)
१७. सामान्य प्रशासन विभाग, का.१६-ब
१८. वित्त विभाग/ आपुक,वित्तीय सुधारणा
१९. विधि व न्याय विभाग, कार्या- १७,२३,२४, व २५
२०. निवडनस्ती,का.१.

विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्रमांक : आपीए २१२०/प्र.क्र.५८/का.१, दि.२० ऑक्टोबर,२०२०
सोबतचे सहपत्र-अ

निबंधक भागीदारी संस्था, महाराष्ट्र राज्य कार्यालयातील कार्यरत गट-क मधील निम्नलिखित कर्मचाऱ्यासाठी निर्माण करण्यात येणारे अधिसंख्य पद.

| अ.क्र. | कर्मचा-याचे नाव | गट | संबंधित अधिका-यासाठी निर्माण करण्यात येणा-या अधिसंख्य पदाचे पदनाम |
|---|---|---|---|
| १ | रविंद्र खेमाजी कुंभारे | गट-क | लिपिक-टंकलेखक |

विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्रमांक : आयपीए २१२०/प्र.क्र.५८/का.१,
दि. २० ऑक्टोबर, २०२० सोबतचे सहपत्र-ब

निबंधक भागीदारी संस्था, महाराष्ट्र राज्य कार्यालयातील यापूर्वी सेवासमाप्त करण्यात आलेल्या गट-क मधील निम्नलिखित कर्मचाऱ्यांकरीता निर्माण करण्यात येणारी अधिसंख्य पदे.

| अ.क्र. | कर्मचाऱ्याचे नाव | गट | संबंधित अधिका-यासाठी निर्माण करण्यात येणा-या अधिसंख्य पदाचे पदनाम | नियुक्तीचा दिनांक | सेवा समाप्तीचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | रविंद्र खेमाजी कुंभारे | गट-क | लिपीक-टंकलेखक | २४.८.१९९८ | ७.९.२००२ |